**महाराष्ट्र शासन**

**निधी वितरण**

क्र.राग्रापा-२०१०/प्र.क्र.१५२/पापु-१०
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १८ जानेवारी, २०११..

प्रति,

१) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
२) संचालक, भुजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, पुणे
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
४) जिल्हाधिकारी, सर्व.

**विषय:-** सन २०१०-११ या आर्थिक वर्षासाठी राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मंजूर करावयाचा केंद्रीय निधी.

**संदर्भ :-** १) शासनाचे समक्रमांकाचे दिनांक ५ जुन, २१ जुलै व २८/१०/१० चे पत्र.
२) केंद्र शासनाच्या गामीण विकास मंत्रालयाच्या पेयजल व स्वच्छता विभागाचे मंजूरी आदेश क्र.W-11020/15/2010/ NRDWP/ Water/65, दिनांक 29/12/2010.

केंद्र शासनाने राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमासाठी सन २०१०-११ मध्ये उपलब्ध करुन दिलेल्या निधीचे वितरण वर संदर्भ क्र.१ मध्ये नमुद केलेल्या शासन पत्रान्वये संबंधित यंत्रणांना करण्यात आले आहे. सन २००९-१० या आर्थिक वर्षात केंद्र शासनाकडून तसेच राज्य शासनाकडून मंजूर केलेला निधी जिल्हा परिषदांनी/भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणेने पूर्णपणे खर्च न केल्यामुळे केंद्र शासनाने सन २०१०-११ चा दुस-या हप्त्याचा निधी वितरित करतांना अखर्चीत रक्कमेच्या प्रमाणात निधीत कपात केली आहे. त्यामुळे केंद्र शासनाकडून दुस-या हप्त्याचा फक्त रु.११५४१.५९ लक्ष निधी प्राप्त झालेला आहे. त्या निधीपैकी रु.७००.०० लक्ष निधी राखून ठेवून उर्वरित रु.१०८४१.५९ लक्ष निधिचे वितरण या पत्रासोबतच्या सहपत्रात नमूद केल्याप्रमाणे करण्यात येत आहे.

सदर निधी वितरणाची कार्यवाही सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी संबंधित जिल्हा परिषदांच्या राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांच्या बँकेतील बचत खात्यात RTGS प्रणालीद्वारे त्वरीत करावी. संबंधित जिल्हा परिषदांच्या बँकांचे नाव, खाते क्रमांक, IFSC code इत्यादिची माहिती सोबतच्या विवरण पत्रात नमूद केली आहे. ज्या जिल्हा परिषदांनी त्यांच्या राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाच्या बँक खात्याची माहिती शासनास कळविली नाही, त्या जिल्हापरिषदांना निधी वितरित करु नये. संबंधित जिल्हा परिषदांकडून त्यांच्या बँक खात्यांची माहिती प्राप्त झाल्यानंतरच त्यांना निधी वितरणाचे आदेश देण्यात येतील.

अधिक्षक अभियंता, भारत निर्माण कक्ष, नागपूर या कार्यालयाकडे फ्लोराईड बाधित गावांमध्ये फ्लोराईड रिमुव्हल संयंत्रे बसविण्याचा कार्यक्रम सोपविण्यात आलेला आहे. काही जिल्हयात नविन संयंत्रे बसविण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर संयंत्रे बसविण्यास येणा-या खर्चासाठी सदर कार्यालयास या आदेशान्वये तूर्तास रु.१००.०० लक्ष निधी मंजूर करण्यात येत आहे.

सदर निधी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने धनादेशाने वितरित करावा. सदर निधी खर्च झाल्यानंतर पुढील निधी उपलब्ध करुन देण्यात यंईल.

मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व) यांना असे कळविण्यात येते की, ज्या जिल्हा परिषदांकडे स्वजलधारा कार्यक्रमांतील निधी अद्याप शिल्लक आहे, त्या जिल्हा परिषदांनी सदर निधी त्या योजनावंर खर्च होणे शक्य नसल्यास तो चालू वर्षीच्या कृती आराखडयात समाविष्ट असलेल्या कव्हरेजच्या/गुणवत्ताबाधित गांवाच्या योजनांवर खर्च करावा. तसेच कव्हरेज व गुणवत्ताबधित या कार्यक्रमाखाली मंजूर केलेला निधी या दोनपैकी कोणत्याही कार्यक्रमात आवश्यकतेनुसार खर्च करता येईल. तथापि असे करताना गुणवत्ताबाधित गावांच्या योजनावर त्याचा विपरित परिणाम होणार नाही याची दक्षता घ्यावी.

मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व) यांना कळविण्यात येते की, राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाच्या धोरणानुसार ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम (सामान्य व गुणवत्ता बाधित) या खाली हाती घेतलेल्या योजनावर ५०% खर्च केंद्रीय निधीतून व ५०% खर्च राज्य निधीतून होणे आवश्यक आहे. राज्य शासनाच्या हिश्श्याची रक्कम राज्यस्तरावरून नळ पाणी पुरवठा योजनांसाठी मंजूर केलेल्या निधीतून किंवा जिल्हा नियोजन मंडळ, टिएसपी, ओटिएसपी, एससीपी व इतर राज्यस्तरीय वा जिल्हास्तरीय योजनांखाली उपलब्ध होणा-या निधीतून खर्च करावी.

सर्व जिल्हाधिकारी यांना विनंती की, ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी शासनाच्या नियोजन विभागाकडून प्राप्त झालेला निधी वार्षिक कृतिआराखडा सन २०१०-११ मध्ये समाविष्ट असलेल्या गावांच्या योजनांसाठी Cash flow प्रमाणे वितरित करावा.

सदर निधी सन २०१०-११ च्या वार्षिक कृतिआराखड्यात समाविष्ट असलेल्या गावांच्या योजनांसाठीच खर्च करावा. तसेच गुणवत्ताबाधित गावांच्या, प्रगतीपथावरील, अनुसुचित जाती-जमाती व अल्पसंख्यांक बहुल गावे/वाड्यांच्या योजना प्राधान्याने पूर्ण कराव्यात. सदर निधी राष्ट्रीय पेयजल कार्यक्रमाच्या मार्गदर्शक सूचनाप्रमाणे खर्च करावा. उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी उपयोगात आणण्यासाठी कालबध्द कार्यक्रम आखून नियोजन करावे.

आता मंजूर केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र व त्यासोबत पूर्ण झालेल्या व प्रगतीपथावरील योजनांची माहिती सादर केल्यानंतर पुढील निधी वितरीत करण्यात येईल.

हे पत्र महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०११०११९१६२०४५००१ आहे.

सही/-
**(फु.स.मेश्राम)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रत :-

१. वित्तीय सल्लागार व मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवी मुंबई.
२. अधीक्षक अभियंता, राज्यस्तरीय भारत निर्माण कक्ष, बेलापूर, नवी मुंबई.

३. अधीक्षक अभियंता, भारत निर्माण कक्ष, सर्व विभागीय आयुक्त कार्यालय.
४. अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, CPDM, कोपरी, ठाणे.
५. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, जिल्हा परिषद, सर्व.
६. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
७. कार्यासन अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, पापु-०८ व पापु-१५,
८. संचालक, ग्रामीण पेयजल आपूर्ती विभाग, ग्रामीण विकास मंत्रालय, ८ वा मजला, पर्यावरण भवन, सीजीओ कॉम्प्लेक्स, लोधी रोड, नवी दिल्ली. ११० ००३.
९. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. महालेखापाल (लेखा), मुंबई/नागपूर.
१२. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
१३. मा. मंत्री/राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे स्वीय सहाय्यक.
१४. मा. मुख्यसचिव यांचे स्वीय सहाय्यक
१५. मा. पालकमंत्री/पालक सचिव, सर्व जिल्हे यांचे स्वीय सहाय्यक.
१६. मा.प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक.
१७. सर्व नियंत्रण अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. मु.अ.तथा वि.का.अ. यांचे स्वीय सहाय्यक.
१९. सर्व कार्यासन अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. निवड नस्ती पापु-१०.

**शासन पत्र क्र. राग्रापा २०१०/प्र.क्र.१५२/पापु-१० ,दि. १८ जानेवारी ,२०११ चे सहपत्र.**

**(रक्कम रु.लाखात)**

| यंत्रणा | सन २०१०-११ मध्ये आतापर्यंत उपलब्ध करुन दिलेला केंद्रीय निधी | या आदेशान्वये मंजूर केलेला निधी | | सन २०१०-११ या आर्थिक वर्षात उपलब्ध करुन दिलेला एकूण निधी |
|---|---|---|---|---|
| | | कव्हरेज | गुणवत्ताबाधित | |
| जि.प. रायगड | १९००.०० | २००.०० | ०० | २१००.०० |
| जि.प. नाशिक | ०० | १५०.०० | ५०.०० | २००.०० |
| जि.प.अहमदनगर | ०० | १००.०० | ०० | १००.०० |
| जि.प.कोल्हापूर | १४००.०० | २००.०० | ०० | १६००.०० |
| जि.प.सांगली | ९३९.६८ | २००.०० | ०० | ११३९.६८ |
| जि.प.औरंगाबाद | ३००.०० | १००.०० | ०० | ४००.०० |
| जि.प.उस्मानाबाद | १५०.०० | १००.०० | ०० | २५०.०० |
| जि.प.बीड | २८००.०० | २००.०० | ०० | ३०००.०० |
| जि.प.हिंगोली | ३००.०० | १००.०० | ०० | ४००.०० |
| जि.प.बुलडाणा | ०० | २००.०० | ०० | २००.०० |
| जि.प.भंडारा | ०० | ०० | ५०.०० | ५०.०० |
| जि.प. गोदिंया | ०० | ०० | ५०.०० | ५०.०० |
| अ.अ.भानिक नागपूर | ०० | ०० | १००.०० | १००.०० |
| म.जी.प्रा. | ८४३६.९२ | ९०४१.५९ | ०० | १७४७८.५१ |
| एकूण | | १०५९१.५९ | २५०.०० | |

सही/-

**(फु.स.मेश्राम)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**शासन पत्र क्र.राग्रापा-२०१०/प्र.क्र.१५२/पापु-१०,दि.१८ जानेवारी २०११ चे सहपत्र**
**राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाचा निधी ज्या बँकेच्या खात्यात RTGS व्दारे जमा करावयाचा आहे त्या खात्यांचा तपशिल व जमा करावयाची रक्कम**

| अ.क्र | यंत्रणा | बँकेचे नाव व पत्ता | शाखा क्र. | खाते क्र. | IFSC code | रक्कम (रु.लाखात) |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | जि.प. रायगड | बँक ऑफ इंडिया अलिबाग | १२०० | १२००१०२१०००००३९ | BKID ०००१२०० | २००.०० |
| २ | जि.प. नाशिक | स्टेट बँक ऑफ इंडिया नाशिक | १४६९ | १०९८०२५६२७० | SBIN ०००१४६९ | २००.०० |
| ३ | जि.प.अहमदनगर | स्टेट बँक ऑफ इंडिया अहमदनगर | ३०३ | ३१५६९८७५६७० | SBIN ००३०३ | १००.०० |
| ४ | जि.प.कोल्हापूर | बँक ऑफ इंडिया कोल्हापूर | ०९०० | ०९००१०११००१०५१४ | BKID००००९०० | २००.०० |
| ५ | जि.प.सांगली | स्टेट बँक ऑफ इंडिया,सांगली | ७९७१ | ११२०३४३६८२० | SBIN०००७९७१ | २००.०० |
| ६ | जि.प.औरंगाबाद | उपलब्ध करुन दिले नाही. | | | | |
| ७ | जि.प.उस्मानाबाद | स्टेट बँक ऑफ इंडिया उस्मानाबाद | १९७४ | ११२८९४३८९५३ | SBIN ०००१९७४ | १००.०० |
| ८ | जि.प.बीड | स्टेट बँक ऑफ हैद्राबाद,बीड | २००२८ | ६२१६९४१३५५१ | SBHY००२००२८ | २००.०० |
| ९ | जि.प.हिंगोली | स्टेट बँक ऑफ इंडिया हिंगोली | ६९६६ | ११०४०८५१२६० | SBIN ०००६९६६ | १००.०० |
| १० | जि.प.बुलडाणा | स्टेट बँक ऑफ इंडिया बुलढाणा | ३४० | ११२५७९६३३५४ | SBIN ००००३४० | २००.०० |
| ११ | जि.प.भंडारा | स्टेट बँक ऑफ इंडिया भंडारा | ०३२८ | ११२४४६२६३०३ | SBIN ००००३२८ | ५०.०० |
| १२ | जि.प. गोदिंया | स्टेट बँक ऑफ इंडिया गोंदीया | ३७६ | ११११९३३०११६ | SBIN००००३७६ | ५०.०० |